**महाराष्ट्र राज्य वनश्री पुरस्कार योजनेचे नांव यापुढे छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार योजना असे सुधारीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलएफ-२०११/प्र.क्र.४२/जल-१२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : २७ जून, २०११**

**वाचा-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : एसएलएफ-१८६/प्र.क्र.१२१७/फ-१२,दि.२३ जून,१९८८
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : एसएलएफ-१८८६/प्र.क्र.१९२२/फ-१२.दि.२६/१०/१९९०
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : एसएलएफ-१८९२/प्र.क्र.७९/फ-१२, दि.१६/६/१९९२
४) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक : एसएलएफ-१८९३//प्र.क्र.२३२/जल-१२, दि.९/८/१९९४
५) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्रमांक -एसएलएफ-१८९३/प्र.क्र.२३२/जल-१२, दि.७ एप्रिल,२००३
६) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्रमांक:एसएलएफ-१८/०३/प्र.क्र.३६१/जल-१२, दि.३०जून,२००४
७) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक : एसएलएफ-१८/०६/प्र.क्र.३६/जल-१२, दि.१०मे, २००६
८) शासन निर्णय.ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक :एसएलएफ-२००७/प्र.क्र.१८८/जल-१२,दि.३० जून, २००८

प्रस्तावना : -

राज्यातील सामाजिक वनीकरणाच्या वनेत्तर क्षेत्रातील वृक्षारोपण व संवर्धन यामध्ये उत्कृष्ट कामगिरी करणा-या व्यक्ती व संस्था यांना सन्मानीत करण्यासाठी सन १९८८ पासून वरील संदर्भ क्र.१ मधील शासन निर्णयान्वये सदरची महाराष्ट्र राज्य वनश्री पुरस्कार योजना सुरु करण्यात आली असून, त्यानुसार दरवर्षी महाराष्ट्र शासनातर्फे वरील संदर्भ क्र.(२) ते (७) मधील संदर्भाधीन शासन निर्णयानुसार राज्यस्तरावर वनश्री पुरस्कार प्रदान करण्याची कार्यवाही करण्यात येत होती. यामध्ये संदर्भ क्र. (८) मधील शासन निर्णयानुसार सुधारणा करुन सदर सुधारीत पुरस्कार योजना सन २००७ पासून महसूल विभागस्तर व राज्यस्तर अशा दोन स्तरावर लागू करण्यास मान्यता दिली आहे.

श्री. छत्रपती शिवाजी महाराजांनी त्यांच्या कार्यकाळात प्रजेच्या हिताची जोपासना तसेच वृक्ष संवर्धन व संरक्षणबाबत जाणीव जागृती व्हावी म्हणून आपल्या सेनादलास **"वृक्षरक्षणाचा"** संदेश देणारे एक आज्ञापत्र काढले आहे. सदर ऐतिहासिक आज्ञापत्रातील वृक्षरक्षणाचा संदेश लक्षात घेऊन सद्या सुरु असलेल्या महाराष्ट्र राज्य वनश्री पुरस्कार योजनेचे नाव यापुढे **छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार योजना** असे सुधारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

सामाजिक वनीकरणाच्या वनेतर क्षेत्रातील वृक्षरोपण व संवर्धन यामध्ये उत्कृष्ट कामगिरी करणा-या व्यक्ती व संस्था यांना सन्मानीत करण्यासाठी सद्या लागू असलेली महाराष्ट्र राज्य वनश्री पुरस्कार ही योजना यापुढे **छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार योजना** म्हणून संबोधण्यात येईल. योजनेचे सदर सुधारीत नाव सन २००९ च्या पुरस्कार निवड व वितरणापासून लागू राहील.

D sandip\JAL-12 2011\CR 42.lwp

तसेच, सदर पुरस्कार **प्रत्येक वर्षी छत्रपती शिवाजी महाराजांच्या जयंती दिनी दि. १९ फेब्रुवारी** या दिवशी प्रदान करण्यात येतील.

२. योजनेच्या फक्त नावात बदल करण्यात आला आहे. त्यामुळे प्रचलित योजनेतील पुरस्काराचे संवर्ग, पुरस्कार संख्या, पुरस्कार निवडण्याची कार्यपध्दती व पुरस्काराचे स्वरुप इत्यादी बाबी पूर्वीप्रमाणेच संदर्भ क्र. (८) मधील दि. ३० जून, २००८ च्या शासन निर्णयाप्रमाणे लागू राहतील.

३ हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक **२०११०६२७१२४७१६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सुनील चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा.मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव,
मा.मंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव, ,
मा.राज्यमंत्री (वने ) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,
अप्पर मुख्य सचिव (वने)
प्रधान सचिव (जलसंधारण)
सचिव (ग्राम विकास)
प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
प्रधान मुख्य वन संरक्षक, नागपूर, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
सर्व मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, -
सर्व उप महासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त,
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग (सर्व जिल्हे)
विभागीय आयुक्त (महसूल विभाग) सर्व,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ व २ मुंबई व नागपूर,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१ व २ मुंबई व नागपूर,
प्रसिध्दी अधिकारी, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व सह सचिव / उपसचिव
निवड नस्ती/जल-१२.